**राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांना सुटी जाहीर करणे तसेच शाळा सुरु करण्याच्या अनुषंगाने निर्देश निर्गमित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१०५ /एस.डी.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० एप्रिल, २०२३.

**<u>शासन परिपत्रक</u>:-**

राज्यामध्ये काही दिवसांपासून तापमानामध्ये वाढ झाली असून सर्वत्र उष्णतेची लाट पसरली आहे. त्यामुळे प्रतिबंधात्मक उपाय म्हणून विद्यार्थ्यांना सुटी जाहीर करण्याची तसेच शाळा सुरु करण्याच्या अनुषंगाने निर्देश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

२. त्यानुसार याअनुषंगाने पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) राज्यातील राज्य मंडळाच्या सर्व शाळांमधील विद्यार्थ्यांना दिनांक २१.०४.२०२३ पासून सुटी जाहीर करण्यात येत आहे.

२) राज्यातील इतर मंडळांच्या शाळा वेळापत्रकानुसार सुरू असल्यास अथवा अशा शाळांमध्ये महत्वाचे शैक्षणिक उपक्रम राबविण्यात येत असल्यास, विद्यार्थ्यांना सुटी जाहीर करण्याबाबत शाळा प्रशासनाने त्यांच्या स्तरावर उचित निर्णय घ्यावा.

३. राज्यातील शाळा सुरू करण्याबाबत एकवाक्यता राहण्याच्या दृष्टीने विदर्भ वगळता सर्व विभागातील शाळा दरवर्षी दिनांक १५ जून रोजी व त्या दिवशी सुटी असल्यास त्याच्या पुढील दिवशी सुरू होतील व विदर्भ विभागातील शाळा दरवर्षी दिनांक ३० जून रोजी व त्यादिवशी सुटी आल्यास त्याच्या पुढील दिवशी सुरू होतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०४२०२००३३८८४२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

IMTIYAZ MUSHTAQUE KAZI

Digitally signed by IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=39a40419de755c2eab61fb555b2fdf8c8d6d652ff18fdffbd9c748ab01f6da04, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=77A529748C5E7C1BA7A66E81C654BA3C492FDA5B29E076241DB1BA213DDEDF4E, cn=IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
Date: 2023.04.20 20:12:05 +05'30'

**( इ. मु. काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
२. प्रधान सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे,
४. राज्य प्रकल्प संचालक,महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,मुंबई
५. संचालक,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र,पुणे
६. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे,
७. शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे
८. अध्यक्ष/सचिव, (सी.बी.एस.ई. बोर्ड), प्रीती विहार,दिल्ली-११००९२.
९. अध्यक्ष/सचिव, (आय.सी.एस.ई. बोर्ड),नेहरू पॅलेस,नवी दिल्ली-११००१९.

१०. अध्यक्ष/सचिव, (आय.बी.बोर्ड),गणपतराव कदम मार्ग,लोअर परेल (प.),मुंबई-४०००१३.
११. अध्यक्ष/सचिव,(केंब्रीज),कोलाबा,मुंबई-४००००५.
१२. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१३. प्राचार्य,जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण विकास संस्था (सर्व),
१४. शिक्षणाधिकारी(प्राथमिक/माध्यमिक),जिल्हा परिषद (सर्व) /सर्व शिक्षण निरीक्षक बृहन्मुंबई महानगरपालिका,
१५. प्रशासन अधिकारी (महानगरपालिका/नगरपालिका) (सर्व),
१६. निवड नस्ती (कार्या.एस.डी.४).